मुख्यमंत्री ग्राम सडक योजने अंतर्गत जालना जिल्ह्यातील पॅकेज क्रमांक JLN- ५७ मधील ग्रामा- ६१ सिरसगाव मंडप रस्ता, ता. भोकरदन या रस्त्याच्या कामास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
**शासन निर्णय क्रमांकः** मुग्रायो-२०२३/प्र.क्र.२९/बांधकाम-४

५ वा मजला, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
तारीख: २६ एप्रिल, २०२३

वाचा :

१) **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्रमांकः** मुग्रायो-२०१८/प्र.क्र.१६२०/बांधकाम-४, दिनांक ३० ऑक्टोबर, २०१८.
२) **मुख्य अभियंता, प्रधान मंत्री ग्रामसडक योजना, पुणे यांचे पत्र क्रमांकः** मु.अ./प्रमंग्रासयो/२४३८/२०२२, दिनांक ३० डिसेंबर, २०२२.

प्रस्तावना :

मुख्यमंत्री ग्राम सडक योजना अंतर्गत जालना जिल्ह्यातील पॅकेज क्रमांक JLN- ५७ मधील ग्रामा- ६१ सिरसगाव मंडप रस्ता, ता. भोकरदन जि. जालना या रस्त्याच्या कामास ग्राम विकास विभागाच्या दिनांक ३० ऑक्टोबर, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये रू.१४१.९७ लक्ष इतक्या रकमेची प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर कामाचा कार्यारंभ आदेश दिनांक २ मार्च, २०१९ रोजी देण्यात आला आहे.

०२. सदर कामाच्या मुळ प्रशासकीय मान्यता रकमेमध्ये रकमेमध्ये DPR सर्व्हेक्षण खर्च GST सह व PVC किंमतीत वाढ झाल्याने, सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव, मुख्य अभियंता, प्र.मं.ग्रा.स.यो., पुणे यांच्या उक्त वाचा मधील अ.क्र.२ येथील दिनांक ३० डिसेंबर, २०२२ रोजीच्या पत्रान्वये सादर केलेला आहे.

०३. सद्यस्थितीत सदर काम भौतिकदृष्ट्या पुर्ण झालेले आहे. विषयांकित कामाच्या मुळ प्रशासकीय मान्यता रकमेमध्ये DPR सर्व्हेक्षण खर्च GST सह व PVC किंमतीत वाढ झाल्याने, कामाच्या किंमतीमध्ये भाववाढ झाली असल्याने सदर कामास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

मुख्यमंत्री ग्राम सडक योजना अंतर्गत जालना जिल्ह्यातील पॅकेज क्रमांक JLN- ५७ मधील ग्रामा-६१ सिरसगाव मंडप रस्ता, ता. भोकरदन जि. जालना या रस्त्याच्या मुळ प्रशासकीय मान्यता रकमेमध्ये DPR सर्व्हेक्षण खर्च GST सह व PVC किंमतीतील वाढीच्या रक्कमेचा अंतर्भाव करणे गरजेचे असल्यामुळे कामाच्या किंमतीमध्ये वाढ झाल्याने, सुधारीत प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता आहे.

०२. उपरोक्त प्रमाणे कामाच्या अंतिम किंमतीमध्ये खालील प्रमाणे वाढ होत आहे.

(Rs.Lakh)

| Package No. | Name of Work | AA Sancation Cost | Awarded Tendered Cost | Revised Expenditure | Excess over AA cost | % Excess over AA cost |
|---|---|---|---|---|---|---|
| *1* | *2* | *3* | *4* | *5* | *6* | *7* |
| JLN- ५७ | ग्रामा-६१ सिरसगाव मंडप रस्ता, ता. भोकरदन जि. जालना | 141.97 | 114.49 | 161.52 | 161.52 | 19.55 |
| **Total** | | **141.97** | **114.49** | **161.52** | **161.52** | **19.55** |

३. उपरोक्त आर्थिक विश्लेषनानुसार काम पुर्ण करावयाचे झाल्यास रू.१६१.५२ लक्ष इतका अंतिम खर्च असुन, सदर कामाच्या प्रशासकीय रक्कमेच्या १३.७७ % जास्तीचा म्हणजेच रू.१९.५५ लक्ष जास्तीचा आहे.

०४. वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ भाग पहिला उप विभाग तीन अनुच्छेद क्र.६ (२७ अ) नुसार, सुधारीत अंदाजातील आधिक्य सुरूवातीस मंजूर केलेल्या अंदाजित खर्चाच्या १५% मर्यादेपर्यंत मंजूर करण्याचे पुर्ण अधिकार प्रशासकीय विभागास आहे. त्यानुसार मुख्यमंत्री ग्राम सडक योजना अंतर्गत जालना जिल्ह्यातील पॅकेज क्रमांक. JLN- ५७ मधील ग्रामा-६१ सिरसगाव मंडप रस्ता, ता. भोकरदन जि. जालना या रस्त्याच्या कामास रू.१६१.५२ लक्ष इतक्या रकमेस खालील नमुद केलेल्या अटींच्या अधीन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

- सदर काम ग्राम विकास विभागाच्या अधिनस्त असलेल्या महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्थेमार्फत, प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेच्या धर्तीवर व ग्राम विकास विभागाच्या अटी व शर्तींवर कार्यान्वीत करण्यात यावीत.
- सदर कामांची नोंद मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेसाठी तयार करण्यात आलेल्या संगणक प्रणालीमध्ये संबंधित कार्यकारी अभियंता यांनी त्वरीत करावी.

०५. सदर कामावरील खर्च "मागणी क्र. एल-७, ५०५४, मार्ग व पूल यावरील भांडवली खर्च ०४, जिल्हा व इतर ग्रामीण मार्ग ३३७, रस्त्यांची बांधकामे (००)(०१), मुख्यमंत्री ग्रामीण मार्ग योजना नवीन

रस्ते बांधणे व अस्तित्वातील रस्त्यांचे नुतनीकरण, ५३ मोठी बांधकामे सीआरसी- ५०५४ ५१५३” या लेखाशीर्षाखाली दर्शविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२३०४२६१७३७५८७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by PATIL PRASHANT VINAYAKRAO
Date: 2023.04.27 12:19:58 +05'30'
Adobe Reader version: 11.0.20

**( प्रशांत पाटील )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.विरोधी पक्षनेता विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.
२. जिल्हाधिकारी, जालना.
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जालना.
४. मुख्य अभियंता, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, कॅम्प ऑफीस, पुणे.
५. खाजगी सचिव, मा. मंत्री (ग्रा.वि.), मंत्रालय, मुंबई-३२.
६. मा.अ.मु.स. (ग्रा.वि. व पं.रा.), ग्राम विकास विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. मा.सचिव, (मु.मं.ग्रा.स.यो.), ग्राम विकास विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
८. अधीक्षक अभियंता, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, छत्रपती संभाजीनगर विभाग, छत्रपती संभाजीनगर.
९. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, जालना.
१०. कार्यकारी अभियंता, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, जिल्हा जालना.
११. कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद, जालना.
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, जालना.
१३. वित्तीय सल्लागार, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना.
१४. माहिती तंत्रज्ञान अधिकारी, प्रधानमंत्री / मुख्यमंत्री ग्रामसडक योजना, महाराष्ट्र राज्य.
१५. निवड नस्ती (कार्यासन बांधकाम-४) ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.